निरीक्षक प्रमाणित शाखा व संस्था / जिल्हा महिला व बाल विकास / रचना व कार्यपद्धती अधि / अधिव्याख्याता / अधिक्षक / सांख्यिकी अधि, गट-ब

**प्रश्नपुस्तिका क्रमांक**

**BOOKLET No.** 200881

24 जानेवारी, 2016

Code : **D07**





**प्रश्नपुस्तिका**

## चाळणी परीक्षा

**वेळ : 1 (एक) तास**

**एकूण प्रश्न : 100**

**एकूण गुण : 200**

## सूचना

(1) सदर प्रश्नपुस्तिकेत **100** अनिवार्य प्रश्न आहेत. उमेदवारांनी प्रश्नांची उत्तरे लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी या प्रश्नपुस्तिकेत सर्व प्रश्न आहेत किंवा नाहीत याची खात्री करून घ्यावी. आणि तसेच इतर काही दोष आढळल्यास ही प्रश्नपुस्तिका समवेक्षकांकडून लगेच बदलून घ्यावी.

(2) आपला परीक्षा-क्रमांक ह्या चौकोनांत **न विसरता बॉलपेनने** लिहावा.




(3) वर छापलेला प्रश्नपुस्तिका क्रमांक तुमच्या उत्तरपत्रिकेवर विशिष्ट जागी उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे **न विसरता नमूद करावा.**

(4) या प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाला 4 पर्यायी उत्तरे सुचविली असून त्यांना 1, 2, 3 आणि 4 असे क्रमांक दिलेले आहेत. त्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तराचा क्रमांक उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे तुमच्या उत्तरपत्रिकेवर नमूद करावा. अशा प्रकारे उत्तरपत्रिकेवर उत्तरक्रमांक नमूद करताना तो संबंधित प्रश्नक्रमांकासमोर छायांकित करून दर्शविला जाईल याची काळजी घ्यावी. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

(5) सर्व प्रश्नांना समान गुण आहेत. यास्तव सर्व प्रश्नांची उत्तरे द्यावीत. घाईमुळे चुका होणार नाहीत याची दक्षता घेऊनच शक्य तितक्या वेगाने प्रश्न सोडवावेत. क्रमाने प्रश्न सोडविणे श्रेयस्कर आहे पण **एखादा प्रश्न कठीण वाटल्यास त्यावर वेळ न घालविता पुढील प्रश्नाकडे वळावे.** अशा प्रकारे शेवटच्या प्रश्नापर्यंत पोहोचल्यानंतर वेळ शिल्लक राहिल्यास कठीण म्हणून वगळलेल्या प्रश्नांकडे परतणे सोईस्कर ठरेल.

(6) उत्तरपत्रिकेत एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर दिल्यास ते तपासले जाणार नाही.

(7) **प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना उमेदवाराच्या उत्तरपत्रिकेतील योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच "उमेदवाराने वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाच्या प्रश्नांची दिलेल्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावीत. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील".**

**पर्यवेक्षकांच्या सूचनेविना हे सील उघडू नये**

## ताकीद

**ह्या प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपेपर्यंत ही प्रश्नपुस्तिका आयोगाची मालमत्ता असून ती परीक्षाकक्षात उमेदवाराला परीक्षेसाठी वापरण्यास देण्यात येत आहे. ही वेळ संपेपर्यंत सदर प्रश्नपुस्तिकेची प्रत/प्रती, किंवा सदर प्रश्नपुस्तिकेतील काही आशय कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही व्यक्तीस पुरविणे, तसेच प्रसिद्ध करणे हा गुन्हा असून अशी कृति करणाऱ्या व्यक्तीवर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचा अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार तसेच प्रचलित कायद्याच्या तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.**

**तसेच ह्या प्रश्नपत्रिकेसाठी विहित केलेली वेळ संपण्याआधी ही प्रश्नपुस्तिका अनाधिकृतपणे बाळगणे हा सुद्धा गुन्हा असून तसे करणारी व्यक्ती आयोगाच्या कर्मचारीवृंदापैकी, तसेच परीक्षेच्या पर्यवेक्षकीयवृंदापैकी असली तरीही अशा व्यक्तीविरुद्ध उक्त अधिनियमानुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती शिक्षेस पात्र होईल.**

पुढील सूचना प्रश्नपुस्तिकेच्या शेवटच्या पानावर पहा

1. खालीलपैकी कोणते विधान ***चुकीचे*** आहे ?
   (1) अर्थशास्त्राच्या नोबेल पारितोषिकाची स्थापना बँक ऑफ स्वीडनने 1968 साली केली.
   (2) 2015 चे अर्थशास्त्राचे नोबेल पारितोषिक ब्रिटिश-अमेरिकी अर्थशास्त्रज्ञ प्रो. अँगस डेटन यांना जाहीर झाले.
   (3) उपभोग, गरीबी आणि विकास यावरील अभ्यासासाठी प्रो. अँगस डेटन यांना हा पुरस्कार जाहीर झाला.
   (4) पुरस्कार वितरण सोहळा ओस्लो, नॉर्वे येथे 10 डिसेंबर रोजी.

---

2. 2015 सालचा 'ह्युमेनिटेरिअन ऑफ दी इयर' हा हार्वर्ड विश्वविद्यालयाचा पुरस्कार कोणाला जाहीर झाला आहे ?
   (1) शुमोना गोयल
   (2) के. चोकर्लिगम
   (3) कैलाश सत्यार्थी
   (4) योगेंद्र सिंग

---

3. खालील विधाने विचारात घ्या :
   अ. भारताच्या पहिल्या 'ॲस्ट्रोसॅट' या अवकाश वेधशाळेचे नुकतेच यशस्वी प्रक्षेपण करण्यांत आले.
   ब. 'ॲस्ट्रोसॅट' बरोबर अमेरिकेचे चार, इंडोनेशिया व कॅनडाच्या प्रत्येकी एका नॅनो उपग्रहाचेही यशस्वी प्रक्षेपण करण्यांत आले.
   क. अमेरिकेचे उपग्रह प्रक्षेपित करण्याची ही दुसरी वेळ होती.
   ड. भारताने आतापर्यंत 51 परदेशी उपग्रह अवकाशात सोडण्याची कामगिरी केली आहे.

   (1) विधाने अ, ब आणि क बरोबर
   (2) विधाने ब, क आणि ड बरोबर
   (3) विधाने अ, ब आणि ड बरोबर
   (4) विधाने अ, ब, क आणि ड बरोबर

---

4. जम्मू-काश्मीर विधानसभा निवडणूकीच्या संदर्भात खालील विधाने विचारात घ्या :
   अ. पी.डी.पी. – भाजप या पक्षांच्या निवडणूकपूर्व यूतीची सत्ता स्थापन झाली.
   ब. जम्मू-काश्मीरचे तेराव्वे मुख्यमंत्री म्हणून मुफ्ती महंमद सईद यांनी शपथ घेतली.
   क. जम्मू-काश्मीरचे शेवटचे राजे हरीसिंह यांच्या सुरक्षारक्षकाचे पुत्र निर्मलसिंह यांनी उप-मुख्यमंत्री म्हणून शपथ घेतली.
   ड. जम्मू-काश्मीरमध्ये भाजप दुसऱ्यांदा सत्तेत सहभागी झाला.

   (1) विधाने अ, ब आणि क बरोबर
   (2) विधाने ब, क आणि ड बरोबर
   (3) विधाने ब आणि क बरोबर
   (4) विधान क फक्त बरोबर

5. 2015 सालच्या अर्जुन पुरस्कार प्राप्त बबिता कुमारीचे योगदान कोणत्या खेळात आहे ?

(1) ॲथलेटिक्स (2) कुस्ती

(3) बॉक्सिंग (4) हॉकी

---

6. पुढील वेन आकृतींतील विविध आकार व्यक्तींची पुढील वैशिष्ट्ये निर्देशित करतात.

चौरस – स्वच्छतेची आवड असणाऱ्या

चौरस नसलेला आयात – हिंदी भाषा बोलणाऱ्या

वर्तूळ – मराठी भाषक

त्रिकोण – कोणतेही काम कमी दर्जाचे न मानणाऱ्या

पंचकोन – माणसात भेदभाव न करणाऱ्या

पुढे दिलेल्या आकृतींपैकी एकाच वेळी फक्त स्वच्छतेची आवड असणाऱ्या, कोणतेही काम कमी दर्जाचे न मानणाऱ्या व मराठी भाषक ही तीनच वैशिष्ट्ये आहेत अशांचा आणि फक्त स्वच्छतेची आवड असणाऱ्या, माणसांत भेदभाव न करणाऱ्या व हिंदी भाषक ही तीनच वैशिष्ट्ये आहेत असे समूह कोणते ?


अ.


ब.


क.


ड.

(1) सर्व (2) अ आणि ब

(3) क आणि ड (4) एकही नाही

---

7. मालिकेतील प्रश्नचिन्हाच्या जागेसाठी उचित पर्याय निवडा.

     


(1)


(2)


(3)


(4)

---

8. सोबतच्या व्यक्तीची ओळख करून देताना बमन मला म्हणाला की त्याचे वडील हे त्याच्या आजीचा तिसरा मुलगा आहेत. त्या व्यक्तीच्या वडिलांचे बमनशी नाते सांगणारा/सांगणारे सर्वात तर्कसंगत पर्याय निवडा.

(1) फक्त काका

(2) काका किंवा वडील

(3) मामा किंवा काका किंवा वडील

(4) मामा किंवा वडील

---

9. रमेश हा वयाने सर्वेशपेक्षा मोठा आहे परंतू महेशपेक्षा लहान आहे. सर्वेश हा वयाने अखिलेश एवढाच आहे परंतू तो सुरेशपेक्षा मोठा आहे. तर

अ. अखिलेश हा सर्वेशपेक्षा लहान आहे.

ब. अखिलेश हा महेशपेक्षा मोठा आहे.

क. अखिलेश हा सुरेशपेक्षा मोठा आहे.

ड. अखिलेश हा रमेशपेक्षा मोठा आहे.

वर दिलेल्या विधानांपैकी कोणते/कोणती विधान/विधाने बरोबर आहे/आहेत ?

(1) अ आणि ड

(2) ब आणि क

(3) फक्त अ

(4) फक्त क

---

10. एका विशिष्ट सांकेतिक भाषेत 'pit ne' म्हणजे 'come here'; 'ne ta ja' म्हणजे 'come and go' आणि 'ja sa re' म्हणजे 'you and me', तर त्या सांकेतिक भाषेत 'ta' म्हणजे काय ?

(1) go

(2) and

(3) here

(4) come

---

11. जर 2 अंगठ्या व 4 बांगड्या यांची किंमत ₹ 46,854 असेल, तर 5 अंगठ्या व 10 बांगड्यांची किंमत किती ?

(1) ₹ 1,15,345

(2) ₹ 1,17,135

(3) ₹ 1,16,675

(4) ₹ 1,12,233

12. त्रिकोनामध्ये कोनांचे गुणोत्तर 1 : 2 : 3 या प्रमाणात आहे तर सर्वात मोठा कोन व लहान कोना मधील फरक किती अंशाचा असेल ?

(1) 30°

(2) 45°

(3) 60°

(4) 90°

---

13. खाली दिलेल्या बेरजेच्या गणितात '*' या चिन्हाच्या स्थानी कोणता अंक असेल ?

```
   * 8 4 3
 + 0 * 3 0
 + 0 1 * 8
 ---------
   3 * 0 1
```

(1) 3

(2) – 2

(3) 2

(4) 5

---

14. जर (7, a), (– 5, 2) व (3, 6) हे बिंदू एकाच सरळरेषेवर असतील, तर a = ?

(1) – 5

(2) 6

(3) 7

(4) 8

---

15. खालील संख्या मालिकेत विसावी ($T_{20}$) संख्या कोणती ?

24, 21, 18, 15, 12, ....

(1) – 11

(2) – 22

(3) – 33

(4) – 44

---

**पुढील परिच्छेद वाचून प्र.क्र. 16 ते प्र.क्र. 19 ची उत्तरे लिहा.**

साहित्याला उपयुक्त असलेला भाषेचा दुसरा मुख्य विषय म्हणजे या भाषेमुळे कल्पनाशक्तीचा वापर सर्वत्र शक्य होतो. केवळ शास्त्रीय सत्य निस्संदिग्ध भाषेत सांगायचे असेल तर कृत्रिमभाषा, चिन्हभाषा नेहमीच जास्त विश्वासार्ह ठरेल, 'जे झालेचि नाही त्याची वार्ता' फक्त साहित्यातच आकर्षक वाटते. रोजच्या व्यवहारातही खोटे बोलणे पुष्कळच असते. पण खोटे बोलणे हे आपण दूषणास्पद मानले तरी त्याचा उपयोग करणे म्हणजे मानवी कल्पनाशक्तीचा (Imagination) उपयोग करणे. अगदी लहान मुलांत सुद्धा कल्पनाशक्ती फार प्रभावी असते. पुष्कळ मुले न पाहिलेल्या गोष्टींचे सुरेख वर्णन करतात, आणि काल्पनिक अनुभव समरसतेने सांगतात. काही वेळा वडील मंडळी त्यांना याबद्दल शिक्षाही करतात. पण हा खरोखर 'कल्पनाशक्ती' या दैवी देणगीचा उपयोग आहे. कल्पनाशक्ती या संकल्पनेचे विश्लेषण शास्त्रज्ञ व तत्त्वज्ञ करतात. पण या शक्तीशिवाय साहित्याला स्वतंत्र अस्तित्वच राहणार नाही. 'खोटे बोलणे' हा शब्दप्रयोग सर्वांनाच अप्रिय वाटतो हे खरे पण 'संपूर्ण सत्य' हा 'तात्त्विक' व नैतिक आग्रह प्रत्येक व्यवहारात आणताना त्या संकल्पनेतील मर्यादा विसरता येत नाहीत. कोणत्या हेतूने आपण एखाद्या घटनेकडे पहात आहोत यांवर त्या घटनेचा अर्थ आपण ठरवतो. हत्तीकडे आंधळ्यांना पाहता येत नाही म्हणून स्पर्शाने ते अनेक निष्कर्ष काढतात ही जुनी कविता प्रसिद्ध आहे. पण प्रत्यक्ष पाहूनसुद्धा सर्व घटना सर्वांना सारख्याच दिसत नाहीत. प्रत्येक वार्ताहराचा (Reporter) वृत्तांत जरा वेगळा असू शकतो. कोर्टातील कोणत्याही केसमधील साक्षीपुरावे व वादविवाद जरा लक्षपूर्वक वाचले तर प्रत्येकाचे अगदी शपथेवर केलेले सत्य निवेदन व त्यावरील वकिलांचे भाष्य यात किती बारीक सारीक तपशीलावर जोर देऊन 'सत्य' ठरवण्याचा प्रयत्न होतो हे रोज वर्तमानपत्रांतील बातम्यांवरून समजते. सर्वत्र मानवी हेतू महत्त्वाचा असतो. कल्पनाशक्तीचा उपयोग सामान्य भाषेत सर्वजण करू शकतात. सांकेतिक भाषांत सर्वांना जमणार नाही. कल्पनाशक्तीचे जीवनांतील व साहित्यातील महत्त्व सर्व तत्त्वज्ञ मान्य करतात व 'निर्भेळ सत्य' या संकल्पनेचा वापर साहित्यांतसुद्धा हवा त्याच वेळी 'वास्तववाद', 'बुद्धिवाद' वगैरे संज्ञा वापरून वारंवार साहित्यावर – विशेषत: काव्यावर – हल्ला करतात.

**16.** सदर परिच्छेदाला योग्य शीर्षक द्या.
(1) साहित्यनिर्मिती
(2) कल्पनाशक्ती
(3) साहित्यनिर्मितीतील कल्पनाशक्तीचे महत्त्व
(4) भाषेची विविध अंगे व साहित्य

**17.** 'जे झालेचि नाही त्याची वार्ता' या उक्तीचा नेमका अर्थ कोणता ***नाही*** ?
(1) कल्पनेने रंगवलेली गोष्ट
(2) वास्तवाचे कल्पकतेने केलेले वर्णन
(3) शास्त्रीय निस्संदिग्ध भाषेपेक्षा कृत्रिम चिन्ह भाषा नेहमीच जास्त विश्वासार्ह वाटते
(4) काल्पनिक गोष्टींवर चर्चा

**18.** 'प्रत्यक्ष पाहून सुद्धा सर्व घटना सर्वांना सारख्याच दिसत नाहीत' या वाक्याचा नेमका अर्थ कोणता ?
(1) दुरून डोंगर साजरे
(2) दिसते तसे नसते
(3) झाकली मूठ सव्वा लाखाची
(4) व्यक्ती तितक्या प्रकृती

**19.** एखाद्या घटनेचा अर्थ कशावर अवलंबून असतो ?
(1) व्यक्तीच्या हेतूवर
(2) व्यक्तीच्या जीवन जगण्याच्या पद्धतीवर
(3) व्यक्तीच्या स्वभावावर
(4) व्यक्तीच्या प्रकृतीवर

**Read the following passage carefully and answer the questions no. 20 to 23 given below it.**

We do not realise adequately to what extent our minds are moulded by books we read especially in youth. We have several means by which we acquire knowledge today i.e. radio, cinema, newspaper and television etc. But reading of books is the most ancient and effective of them all. Reading a book is different from mechanised instruction. We are never alone when we have books as our companions.

A great writer has said that religion is what man does with his solitariness. It is not merely religion but art and literature, scientific discovery and technological invention that are the outcome of what a man does with his solitariness. In the modern world we tend to be gregarious beings. When we have a little leisure we run to parties, clubs or other social activities. We are afraid to be alone with ourselves, afraid to stand and stare, much less to sit and think. We are happy with others not with ourselves. Pascal tells us that all the evils of the world arise from the fact that men are unable to sit still in a room. Reading a book gives us the habit of solitary reflection and true enjoyment.

---

**20.** "We have several means...and television etc."
Add a question tag to the above statement.
(1) Isn't it ? (2) Don't we ? (3) Haven't we ? (4) Can't we ?

---

**21.** "When we have a little leisure, we run to parties, clubs or other social activities."
Rewrite the above sentence in the "No sooner... than..." form.
(1) No sooner we have a little leisure than we run to parties, clubs or other social activities.
(2) No sooner have we a little leisure then we run to parties, clubs, or other social activities.
(3) No sooner do we have a little leisure than we run to parties, clubs or other social activities.
(4) No sooner than we have a little leisure, then we run to parties, clubs or other social activities.

---

**22.** "We do not realise adequately to what extent our minds are moulded by books."
Choose the best question among the given options for getting the underlined word as the answer.
(1) What do we not realise ?
(2) To what extent do we not realise ?
(3) Do we realise how our minds are moulded by books ?
(4) To what extent are our minds moulded by books ?

---

**23.** We have several means by which we acquire knowledge today.
Select the correct simple sentence of the above sentence.
(1) We have several means to acquire knowledge.
(2) We have several means that are useful to acquire knowledge today.
(3) We have several means and we acquire knowledge with them.
(4) There are several means with which we acquire knowledge today.

---

24. 'जर वाहक चुंबकीय क्षेत्रात फिरत असेल किंवा वाहक स्थिर ठेवून त्याच्या भोवतालचे चुंबकीय क्षेत्र बदलत असेल तर विद्युत धारा निर्माण होते.' हे कोणत्या शास्त्रज्ञाने सर्वप्रथम अभ्यासले ?

(1) हर्टझ (2) मॉयकेलसन

(3) मॉयकेल फॅरेडे (4) जे.जे. थॉमसन

25. समुद्राची खोली मोजण्यासाठी __________ तंत्रज्ञान वापरतात.

(1) सोनार (Sonar) (2) लुनार (Lunar)

(3) सोलर (Solar) (4) नॅनो (Nano)

26. गोबरगॅस संयंत्रातून __________ हा वायू मिळतो.

(1) ब्यूटेन (2) इथेन

(3) प्रोपेन (4) मिथेन

27. प्लॅस्टर ऑफ पॅरिस ह्या संयुगाचे रासायनिक सुत्र खालीलपैकी __________ आहे.

(1) $2CaSO_4 . H_2O$

(2) $CaSO_4 . 2H_2O$

(3) $CaSO_4$

(4) $CaSO_4 . H_2O$

28. खालीलपैकी कोणते कर्बोदक दुधामधे आढळून येते ?

(1) ग्लुकोज (2) फ्रुक्टोज

(3) स्टार्च (4) लॅक्टोज

29. खालील कोणते विधान ***चुकीचे*** आहे ?

(1) जलचर प्राण्यांच्या श्वासोश्वासाची गति जास्त असते.

(2) जलचर श्वसनासाठी पाण्यात विरघळलेल्या ऑक्सीजनचा उपयोग करतात.

(3) ऑक्सीजन पाण्यामध्ये अतिशय जास्त प्रमाणात विरघळतो.

(4) जलचर प्राण्यांना उपलब्ध असलेला ऑक्सीजन हवेतील ऑक्सीजनपेक्षा खूप कमी असतो.

30. हॅरी जॉन्सन् ह्यांच्या मते, 'सामाजिक परिवर्तन म्हणजे मूलभूत अर्थाने __________ बदल होय'.

(1) स्तरीकरण व्यवस्थेतील

(2) समाजसंरचनेतील

(3) सांस्कृतिक व्यवस्थेतील

(4) समाजव्यवस्थेतील

---

31. संशोधनातील 'नमुनानिवड पद्धतीचा जनक' म्हणून __________ यांना ओळखले जाते.

(1) कार्ल पिअरसन्

(2) किंग्जले डेव्हिस

(3) ए.एल्. बाऊले

(4) चार्लस् बूथ

---

32. भारतीय समाजात वधु निवडी संबंधात स्थुलमानाने हे निर्बंध दिसून येतात.

अ. संमतिदर्शक निर्बंध

ब. निषेधात्मक निर्बंध

क. परव्यवसाय निर्बंध

ड. प्राधान्यदर्शक निर्बंध

वरीलपैकी कोणते/कोणती विधान/विधाने बरोबर आहे/आहेत ?

(1) फक्त अ

(2) फक्त क

(3) अ, ब आणि ड

(4) अ, ब आणि क

---

33. __________ ह्यांना शैक्षणिक समाजशास्त्राचा जनक म्हणून ओळखले जाते.

(1) रेमंड मूर

(2) टॉलकॉट पार्सन्स्

(3) जॉर्ज पेन

(4) किंग्जले डेव्हिस

---

34. 'एकदाचा संपर्क तो कायमचा संपर्क' ह्या तत्त्वावर विश्वास ठेवून जी जादू केली जाते तीला __________ जादू म्हणतात.

(1) सहाय्यक

(2) सांस्कृतिक

(3) अनुकरणात्मक

(4) संपर्कात्मक

---

35. कुत्र्याला अन्न देतांना घंटानाद करणे असे आपण बऱ्याच वेळा केले तर केवळ सराव आणि सवय यातुन आपण नवे वागणुकीचे प्रकार शिकतो. हे पाव्हलॉव्हने दाखवून दिले.

अ. हे कंडिशन्ड लर्निंग होय. ब. हे अनकंडिशन्ड रिफ्लेक्स अध्ययन होय.

क. हे प्रयत्न-प्रमाद अध्ययन होय. ड. हे बोधात्मक अध्ययन होय.

वरीलपैकी कोणते/कोणती विधान/विधाने बरोबर आहे/आहेत ?

(1) फक्त अ (2) फक्त अ आणि ब

(3) फक्त अ आणि ड (4) फक्त अ, ब आणि क

---

36. अभिजात अभिसंधानाबाबत कोणते/कोणती विधान/विधाने खरी आहे/आहेत ?

अ. अभिजात अभिसंधानाचा प्रयोग स्किनर यांनी केला.

ब. अभिजात अभिसंधानात उद्दिपकाला महत्व असते.

क. अभिजात अभिसंधानाचा प्रयोग पॅव्हलॉव्ह यांनी केला.

ड. अभिजात अभिसंधानाचा प्रयोग कुत्र्यावर करण्यात आला.

(1) फक्त क (2) फक्त अ आणि ड

(3) फक्त ब, क आणि ड (4) फक्त अ, ब आणि ड

---

37. मानसशास्त्रातील असा/असे कोणता/कोणते दृष्टीकोन आहे/आहेत जो/जे 'तीसरी शक्ती' म्हणून ओळखला जातो/जातात ?

अ. मनोविश्लेषणात्मक दृष्टीकोन ब. वर्तनवादी दृष्टीकोन

क. बोधात्मक मानसशास्त्र दृष्टीकोन ड. मानवतावाद

वरीलपैकी कोणता पर्याय योग्य आहे ?

(1) फक्त अ आणि क (2) फक्त ब

(3) फक्त क आणि ड (4) फक्त ड

---

38. खालीलपैकी कोणत्या स्मृतीची/स्मृतींची धारणा क्षमता सर्वात कमी असते ?

अ. वेदनिक स्मृती ब. अल्प स्मृती

क. श्राव्य स्मृती ड. प्रतिमा स्मृती

(1) फक्त अ आणि ब (2) फक्त क

(3) फक्त क आणि ड (4) फक्त ड

---

39. आपल्या स्मृतीत सात गोष्टी सहजरीत्या चटकन लक्षात ठेवू शकतो अशी थिअरी ________ या मानसशास्त्रज्ञाने प्रथम मांडली.

(1) जॉर्ज मिलर (2) वूंट

(3) जॉर्ज स्पर्लिंग (4) स्टीव्हन राईट

40. इंटरनेटवर असंख्य उपभोक्त्यापैकी कोणता उपभोक्ता अनैतिक, असंवैधानिक गैरप्रकार करीत आहे, ते शोधण्याकरिता काय वापरतात ?

(1) सिस्टम लोकेशन ॲड्रेस, एस.एल.ए. (System Location Address, SLA)

(2) पर्सनल आयडेंटिटी कोड, पी.आय.सी. (Personal Identity Code, PIC)

(3) सिस्टम आयडेंटिटी कोड, एस.आय.सी. (System Identity Code, SIC)

(4) मीडिया एक्सेस कंट्रोल एड्रेस, एम.ए.सी. एड्रेस (Media Access Control Address, MAC Address)

---

41. ई-कॉमर्समध्ये सर्वसामान्य सुरक्षा साधक म्हणून वापरतात ते ________ .

(1) ऑथेंटीकेशन व एक्सेस कंट्रोल (Authentication and Access Control)

(2) इनक्रिप्शन व फायरवॉल (Encryption and Firewall)

(3) इंट्रयुजन डिटेक्शन सिस्टम (Intrusion Detection System)

(4) वरील सर्व पर्याय

---

42. खालील पर्यायापैकी दुर्भावनयुक्त (malicious) कोड कोणते आहे ?

अ. व्हायरस (Virus)

ब. वर्म (Worm) व रॉबीट (Rabbit)

क. टाईम बॉम्ब (Time Bomb)

ड. लॉजीकल बॉम्ब (Logical Bomb)

(1) अ आणि क

(2) अ आणि ब

(3) अ, ब आणि ड

(4) अ, ब, क आणि ड

---

43. ई-मेल पाठविण्याकरिता व प्राप्तकरण्याकरिता कोणता प्रोटोकॉल वापरतात ?

(1) सिम्पल मेल ट्रान्सफर प्रोटोकॉल, एस.एम.टी.पी. (Simple Mail Transfer Protocol, SMTP)

(2) पोस्ट-ऑफीस प्रोटोकॉल, पी.ओ.पी. (Post-Office Protocol, POP)

(3) इंटरॲक्टीव मेल एक्सेस प्रोटोकॉल, आय.एम.ए.पी. (Interactive Mail Access Protocol, IMAP)

(4) वरील सर्व पर्याय

---

44. एक्स.एम.एल. (XML) चे विस्तारीत नाव काय ?

(1) एक्सटेंडेड मॅक्सीमम लेवल (Extended Maximum Level)

(2) एक्सप्रेस मशीन लेवल (Express Machine Level)

(3) एक्सटेन्सीबल मार्कअप लँग्वेज (Extensible Markup Language)

(4) एक्सप्रेस मशीन लँग्वेज (Express Machine Language)

---

45. समाजकार्य म्हणजे _________ होय.

(1) दान करणे

(2) श्रमदान किंवा बिनावेतन सेवा

(3) लोकांना आत्मनिर्भर बनविणे

(4) नैसर्गिक आपत्तिच्या वेळी केलेले मदतकार्य

---

46. विवाद असणे, परस्पर विरोधी असणे या गोष्टी असूनही समाज कार्य परिशीलन व सिद्धांताचे महत्वपूर्ण अंग असणाऱ्या मूल्याबाबत खालीलपैकी कोणती विधाने योग्य आहेत ?

अ. भावनांचे हेतूपूर्ण प्रकटीकरण

ब. निर्णयविरहित दृष्टिकोन

क. गोपनीयता

ड. स्व ओळख – कार्यकर्ता व अशिल

(1) फक्त अ आणि क

(2) फक्त ब आणि क

(3) फक्त अ, ब आणि क

(4) वरील सर्व अ, ब, क आणि ड

---

47. सर्वधर्म समभाव, कुलदेवतावर विश्वास, एकेश्वरवाद, प्रेम आणि सेवेच्याद्वारे ईश्वर प्राप्ती ही खालीलपैकी कोणत्या विचारधारेची वैशिष्ट्ये आहेत ?

(1) भक्ती चळवळ (2) सूफी चळवळ

(3) शिख धर्म (4) बौद्ध धर्म

---

48. समाजकार्याचे हे वैशिष्ट्य *नाही*

(1) मदत करण्याची क्रिया

(2) कार्यकर्त्याचे निर्णय आशिलावर लादणे

(3) लोकशाही मधे विश्वास

(4) स्वत:च्या सेवा पद्धती

---

49. _________ म्हणजे प्रत्यक्ष कृती करण्यासाठी समाजाने स्वीकारलेले आधारभुत तत्वज्ञान होय.

(1) अग्रकम बाब (2) स्पष्टीकरण

(3) विचारधारा (4) गृहित

50. केंद्रीय समाजकल्याण मंडळाची स्थापना कोणत्या वर्षी करण्यात आली ?

(1) 1963
(2) 1953
(3) 1954
(4) 1965

---

51. ब्राह्मो समाजाची स्थापना कोणी केली ?

(1) आचार्य विनोबा भावे
(2) संपत मोहन रॉय
(3) राजा राममोहन रॉय
(4) महात्मा गांधी

---

52. समस्याग्रस्त व्यक्तीच्या समस्या सोडविणे व त्यांच्या गरजा पूर्ण करणे व ________ करणे हे समाजकार्याचे लक्ष आहे.

(1) विकास
(2) कल्याणात्मक कार्य
(3) सहाय्य
(4) सुधारात्मक कार्य

---

53. समाजकार्याच्या कोणत्या पद्धती मध्ये एक व्यक्तीकडून दुसऱ्या व्यक्तीच्या समस्या सोडविण्याचा प्रयत्न केला जातो ?

(1) समुदाय संघटन कार्य
(2) सामाजिक व्यवस्थापन
(3) सामाजिक कृती
(4) व्यक्ती सहाय्य कार्य

---

54. भारतातील व्यावसायिक समाजकार्याची पहिली संस्था कोणती ?

(1) सेरामपूर मिशन
(2) केंद्रीय समाजकल्याण मंडळ
(3) सर दोराबजी टाटा ग्रॅज्युएट स्कूल ऑफ सोशल वर्क, मुंबई
(4) भारतीय समाज कार्य परिषद

---

55. पंचायतींच्या लेख्यांची लेखा-परीक्षा करून घेणे ________ ची जबाबदारी आहे, असे संविधानाच्या भाग नऊ मध्ये दिले आहे.

(1) जिल्हाधिकारी
(2) लोक सभा
(3) राज्याचे राज्यपाल
(4) राज्याचे विधानमंडळ

56. भारतीय राज्यघटनेच्या प्रस्तावनेमध्ये समाजवाद व धर्मनिरपेक्षता हे शब्द या घटनादुरूस्तीने समाविष्ट झाले आहेत.

(1) 39वी
(2) 42वी
(3) 44वी
(4) 52वी

57. लोकसभेचे विसर्जन करण्याचा अधिकार कोणाला आहे ?

(1) पंतप्रधान
(2) केंद्रीय मंत्रिमंडळ
(3) राष्ट्रपती
(4) सभापती

58. भारतीय राज्यघटनेतील जिल्हापरिषद पंचायत समिती व ग्रामपंचायत संबंधीच्या तरतुदी या केंद्रशासित प्रदेशांना सुद्धा लागू आहेत. हे वाक्य ________ आहे.

(1) चूक
(2) बरोबर
(3) अंशत: चूक व अंशत: बरोबर
(4) सांगू शकत नाही

59. राज्यघटनेनुसार पंचायत म्हणजे पुढील कलमानुसार स्थापन झालेली स्थानिक स्वराज्य संस्था होय

(1) 221 अ
(2) 243 ब
(3) 248 क
(4) 273 अ

60. महानगरपालिकेचे खालीलपैकी कोणते कार्य ***नाही*** ?

(1) मालमत्ताकर गोळा करणे
(2) नगरविकासासाठी विविध योजना आखणे
(3) महिला आणि बालकल्याणासाठी उपक्रम राबविणे
(4) आयकर निश्चित करून गोळा करणे

61. संयुक्त राष्ट्रांच्या आमसभेने 10 डिसेंबर 1948 रोजी जो मानवी हक्कांचा जागतिक जाहीरनामा घोषित करून स्वीकारला आहे, त्यामध्ये एकून किती कलमे आहेत ?

(1) 30

(2) 53

(3) 14

(4) वरीलपैकी एकही नाही

62. मानव अधिकार संरक्षण कायदा, 1993 नुसार राष्ट्रीय ________ आयोगाचे अध्यक्ष हे राष्ट्रीय मानव अधिकार आयोगाचे सदस्य असतील.

(1) बालक

(2) महिला

(3) अपंग

(4) मागासवर्गीय

63. 1994 मध्ये युनिसेफच्या पुढाकाराने लष्करात भरतीची वयोमर्यादा ही 15 वर्षा ऐवजी ________ वर्षे करण्यात आली आहे.

(1) 18 वर्षे

(2) 20 वर्षे

(3) 21 वर्षे

(4) वरीलपैकी कोणतेही नाही

64. 'मानवी हक्क' याचा अर्थ, व्यक्तींचे जीवन, स्वातंत्र्य, समता व प्रतिष्ठा या संबंधीचे संविधानाने हमी दिलेले किंवा आंतरराष्ट्रीय प्रसंविदेमध्ये समाविष्ट करण्यात आलेले आणि भारतातील न्यायालयांना अंमलबजावणी करता येईल असे हक्क, असा होतो. – ही मानवी हक्काची व्याख्या खालीलपैकी कशामध्ये दिलेली आहे ?

(1) नागरी हक्क संरक्षण अधिनियम, 1955

(2) अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती (अत्याचारास प्रतिबंध) अधिनियम, 1989

(3) मानवी हक्क संरक्षण अधिनियम, 1993

(4) वरीलपैकी कशामध्येच नाही

65. जोड्या लावा :

| हक्क/कर्तव्य | | भारतीय संविधान अनुच्छेद | |
|---|---|---|---|
| अ. | 6 ते 14 वयोगटातील मुलांना मोफत आणि सक्तीने शिक्षण देणे हे सरकारचे कर्तव्य आहे | I. | अनुच्छेद 39 (1) |
| ब. | आर्थिक कारणांकरिता लहान मुलांच्या वयाला आणि शक्तीला झेपणार नाहीत अशी कामे त्यांना करायाला भाग पाडू नये | II. | अनुच्छेद 51 ए (के) |
| क. | मुलांची निकोप, स्वतंत्र आणि आत्मसन्मानाने वाढ होण्यासाठी मुलांना तशी संधी आणि सुविधा मिळवून देणे | III. | अनुच्छेद 21 (अ) |
| ड. | पालक किंवा आई-वडिल असलेल्या सर्व नागरिकांवर लहान मुलांना शिक्षणाची संधी देण्याची जवाबदारी आहे | IV. | अनुच्छेद 39 (9) |

| | अ | ब | क | ड |
|---|---|---|---|---|
| (1) | II | IV | III | I |
| (2) | III | IV | I | II |
| (3) | IV | III | II | I |
| (4) | I | II | III | IV |

66. राष्ट्रीय महिला आयोग कायदा, 1992 च्या कलम 10 अंतर्गत _________ हा महिला आयोगाचा 'गाभा' आहे.

(1) तक्रार व समुपदेशन
(2) गुन्हेगारास अटक करणे
(3) महिलांना काम मिळवून देणे
(4) वरीलपैकी एकही नाही

67. संयुक्त राष्ट्र आणि जागतिक समुदाय सहस्रकातील विकासाची पुढीलपैकी कोणती ध्येये गाठण्यासाठी वचनबद्ध आहेत ?

(1) दारिद्र्य आणि उपासमारीचे निर्मूलन
(2) जगभरात प्राथमिक शिक्षणाचे ध्येय साध्य करणे
(3) स्त्री-पुरुष समानता आणि महिला सक्षमीकरणाला इ.स. 2015 पर्यंत बळकटी देणे
(4) वरील सर्व

68. मानवी हक्कांना नेहमीच

(1) वैश्विक म्हणून बघितले जाते
(2) अविभाज्य म्हणून बघितले जाते
(3) मूलभूत हक्क म्हणून बघितले जाते
(4) वरील सर्व

69. यु.एन.सी.आर.सी. (UNCRC) ला भारताने औपचारिक मान्यता कधी दिली ?
   (1) सप्टेंबर 1990
   (2) डिसेंबर 1990
   (3) सप्टेंबर 1992
   (4) डिसेंबर 1992

70. मातृत्व अनुदान योजना मेळघाटातील कोरकू आदिवासींमधील ________ थांबविण्याच्या दृष्टीने सुरू झाली.
   (1) बालकांचे स्थलांतर
   (2) महिला अपघात
   (3) बालमृत्यू
   (4) बालअपराध

71. खाजगी किंवा सार्वजनिक ठिकाणच्या लैंगिक अत्याचार व हिंसाचारग्रस्त महिलेला 'वन स्टॉप सेंटर' या योजनेखाली खालीलपैकी कोणता लाभ मिळेल ?
   अ. वैद्यकीय सहाय्य, तात्पुरता निवारा
   ब. पोलीस सहाय्य
   क. मनो-सामाजिक आधार, समुपदेशन
   ड. व्हिडीओ कॉन्फरन्सिंग सोय

   (1) फक्त अ
   (2) फक्त ब
   (3) फक्त अ आणि क
   (4) अ, ब, क आणि ड

72. राजमाता जिजाऊ माता व बालक पोषण मिशन संबंधी खालीलपैकी कोणते विधान बरोबर आहे ?
   अ. आरोग्य आणि पोषण मिशन तांत्रिक, सल्लागार आणि प्रशिक्षण मंडळ म्हणून कार्य करते.
   ब. मिशनसाठी क्षेत्रीय सेवकवर्ग/समांतर यंत्रणा उपलब्ध नाही.
   क. राज्य अंदाजपत्रकात तरतुद करून मिशनला निधी दिला जात नाही.

   (1) फक्त अ
   (2) फक्त ब
   (3) फक्त क
   (4) वरील सर्व अ, ब आणि क

73. संयुक्त राष्ट्रसंघटनेने ________ साल हे "आंतरराष्ट्रीय बालक वर्ष" म्हणून जाहीर केले होते.
(1) 1975 (2) 1978
(3) 1990 (4) 1970

74. स्थायी राष्ट्रीय व्यासपीठ म्हणून रचना केलेल्या राष्ट्रीय महिला आयोगाचे अध्यक्ष, सचिवासह किती पूर्णकालीन सदस्य असतात ?
(1) 1 (2) 5
(3) 7 (4) 10

75. विजेच्या बल्बमध्ये ____________ वायू असतो.
(1) हायड्रोजन (2) अरगॉन
(3) नायट्रोजन (4) झेनॉन

76. केंद्र सरकारने प्रसूतिपूर्व चिकित्सा तंत्र (नियमन आणि दुरूपयोग प्रतिबंध) 1994 हा कायदा केव्हा अस्तित्वात आणला ?
(1) 1 जानेवारी 1996
(2) 15 जानेवारी 1995
(3) 5 जानेवारी 1975
(4) 1 जानेवारी 1987

77. माहितीचा अधिकार अधिनियम, 2005 खालीलपैकी कोणत्या दृष्टीने गरजेचा आहे ?
(1) लोकशाहीमध्ये माहीतगार नागरिक होण्यासाठी
(2) माहितीत पारदर्शकता आणून कार्यशील लोकशाही बनविण्यासाठी
(3) भ्रष्टाचाराला आळा घालून, राज्य शासन व त्यांच्या यंत्रणांना जनतेला जाब देण्यास उत्तरदायी ठरविण्यासाठी
(4) वरील सर्वांसाठी

78. एखादी व्यक्ती जर अस्पृश्यतेच्या आधारावर दवाखान्यात कोणाला दाखल करून घेण्यास नकार देत असेल तर त्यास कमीतकमी एक महिन्याची व जास्तीत जास्त ________________ कारावासाची शिक्षा शकते.
(1) 2 वर्षे
(2) 1 वर्ष
(3) 6 महिने
(4) 3 महिने

79. अनैतिक व्यापार प्रतिबंध अधिनियम, 1956 नुसार कुंटनखाना चालविण्याकरिता जागा उपलब्ध करून दिल्यास पुढील शिक्षा होईल

(1) दहा वर्ष कैद अथवा दंड

(2) एक ते तीन वर्षापर्यंत कैद अथवा 2 हजार रुपये दंड

(3) पाच वर्ष कैद अथवा 10 हजार रुपये दंड

(4) सात वर्ष कैद अथवा 5 हजार रुपये दंड

---

80. बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, 2000 नुसार महाराष्ट्र राज्यात गठित राज्य सल्लागार मंडळाचे अध्यक्ष कोण असते ?

(1) उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश किंवा सेवानिवृत्त सचिव

(2) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग

(3) बालमानसशास्त्र तज्ज्ञ

(4) बाल कल्याण क्षेत्रातील विख्यात सामाजिक कार्यकर्ता

---

81. "भारताचा लाचलुचपत प्रतिबंध कायदा, 1988" च्या अंतर्गत एखादा जनसेवक केव्हा गुन्हेगार ठरतो ?

अ. स्वत: समक्ष लाच घेण्याचा प्रयत्न करतो.

ब. काम करण्यासाठी लाच घेतो पण काम करत नाही.

क. काम करण्यासाठी किंमती वस्तू स्विकारतो.

ड. अतिशय किरकोळ किंमतीची भेंटवस्तू दिवाळीत स्विकारतो.

(1) अ, ब आणि क (2) अ आणि क

(3) अ, क आणि ड (4) सर्व बाबतीत गुन्हेगार ठरतो

---

82. नागरी हक्क संरक्षण अधिनियम, 1955 नुसार धार्मिक असमर्थता लादल्यास पुढील शिक्षा होईल

(1) एक ते सहा महिने कैद आणि 100 ते 500 रुपये दंड

(2) तीन ते नऊ महिने कैद आणि 500 ते 1,000 रुपये दंड

(3) एक वर्ष कैद अथवा दंड

(4) सहा महिने कैद आणि 10,000 रुपये दंड

---

83. गर्भधारणापूर्व व प्रसूतिपूर्व निदान तंत्र अधिनियम, 1994 च्या कलम 2(जे) नुसार गर्भधारणापूर्व निदान पद्धतीचा अवलंब खालीलपैकी कोणावर केला जातो ?

(1) फक्त महिला (2) फक्त पुरुष

(3) पुरुष किंवा महिला (4) सांगू शकत नाही

---

84. कौटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे संरक्षण अधिनियम, 2005 च्या कलम 8 ने ________ च्या नियुक्ती ची सोय केली आहे.

(1) कार्यकारी अधिकारी
(2) आरक्षण अधिकारी
(3) संरक्षण अधिकारी
(4) दंडाधिकारी

85. पदार्थ शिजविताना कोणत्या माध्यमात जीवनसत्व नाशाचे प्रमाण कमी होते ?

(1) आम्ल माध्यमात
(2) अल्क माध्यमात
(3) क्षार माध्यमात
(4) वरीलपैकी कुठलेहि नाही

86. खालीलपैकी कोणत्या राष्ट्रीय एजेन्सीज पोषणविषयक काम करतात ?

(1) नॅशनल इंस्टिट्यूट ऑफ न्यूट्रीशन
(2) ससमिरा
(3) नॅशनल केमिकल लॅब
(4) एन.आय.एफ.टी.

87. संपूर्ण द्रव-आहार (clear liquid diet) कोणत्या अवस्थेत दिला जातो ?

(1) मधुमेही व्यक्तीस आठवड्यातून दोन दिवस
(2) उच्चरक्तदाबात
(3) शस्त्रक्रियेपूर्वी व नंतर एक ते दोन दिवस
(4) वरीलपैकी कुठलेहि नाही

88. आहारातील प्रथिनाची गुणवत्ता ही त्यामध्ये असलेल्या कोणत्या पोषक घटकाच्या आधारावर ठरविली जाते ?

(1) प्रथिनाच्या प्रमाणानुसार
(2) तिक्ताम्लाच्या प्रमाणानुसार
(3) आवश्यक तिक्ताम्लाच्या प्रमाणानुसार
(4) वरीलपैकी कुठलेहि नाही

89. कोणते रोग किडनीला अपाय करतात ?

(1) अनियंत्रित हायपरटेंशन
(2) अनियंत्रित टाईप-टू मधुमेह
(3) केमिकल टॉक्सीसिटी
(4) वरील सर्व

90. International Union of Nutritional Science ने उर्जेच्या नवीन कोणत्या एककाचा अंगीकार केला आहे ?

(1) जूल (Joule)
(2) कॅलरी (Calorie)
(3) किलोकॅलरी (Kilocalorie)
(4) वरील सर्व

91. वाढ निदर्शक नोंदणीपत्रकावर (Road to Health Card) कशाची नोंद केली जाते ?

(1) उंची
(2) लसीकरण
(3) वजन
(4) जलसंजीवनी

92. मुलांचे पक्के, मजबूत व कायम दात या वयात येतात

(1) 12 वर्षानंतर
(2) 8 ते 10 वर्षानंतर
(3) 4 ते 5 वर्षानंतर
(4) 3 ते 4 वर्षानंतर

93. शुष्क बर्फ तयार करण्यासाठी ____________ वापर करतात.

(1) ऑक्सीजन
(2) क्लोरीन
(3) हायड्रोजन
(4) कार्बन डायऑक्साइड

94. मूल ________ आठवड्याचे होईपर्यंत मातेचे दूध हे त्याच्यासाठी सर्वात योग्य अन्न असते.

(1) 31 ते 35
(2) 25 ते 26
(3) 30
(4) 18 ते 24

95. नवजात अवस्थेचे वय हे _________ आहे.

(1) जन्मापासून 1 आठवड्यापर्यंत
(2) जन्मापासून 2 आठवड्यापर्यंत
(3) जन्मापासून 3 आठवड्यापर्यंत
(4) जन्मापासून 4 आठवड्यापर्यंत

96. खालीलपैकी कोणते विधान बरोबर आहे ?

अ. पूर्वबाल्यावस्थेला टोळीपूर्व वय म्हणतात.

ब. शालेय पूर्व – नर्सरी स्कूल, डे केअर सेंटर, किंडरगार्टन मध्ये जाणारी मुले तुलनेने जास्त सामाजिक संपर्क व सामाजिक समायोजन साधतात.

क. 2 ते 6 वयाची मुले इतरांशी जुळवून घेणे, खेळक्रियामध्ये सहकार्य करण्यास शिकतात.

(1) फक्त अ (2) फक्त ब
(3) फक्त क (4) वरील सर्व अ, ब आणि क

---

97. "निराश्रित बालकांसाठी संस्था" या योजनेखाली स्वयंसेवी संस्थेमार्फत कोणत्या प्रकारच्या संस्था चालविल्या जातात ?

अ. अनाथालय ब. निराश्रित बालकाश्रम
क. बालसदन ड. बाबावाडी

(1) अ, ब, क आणि ड (2) अ आणि ड
(3) अ, ब आणि क (4) फक्त ब

---

98. कर्मचारी महिलांकरिता निवासगृह बांधण्याकरिता बांधकाम खर्चाच्या किती टक्के अनुदान संस्थांना केंद्र शासनाकडून प्राप्त होत असते ?

(1) 25% (2) 50%
(3) 75% (4) 100%

---

99. शैशवावस्थेतील धोक्यासंबंधी खालीलपैकी कोणते विधान ***चुकीचे*** आहे ?

अ. शैशवावस्थेच्या पहिल्या वर्षी गंभीर आजार तर दुसऱ्या वर्षी अपघात हे मृत्यूचे कारण दिसून येते.

ब. विलंबित कारक विकासामुळे सामान्य कौशल्ये संपादन करण्यात अशी मुले मागे पडतात, अपयशी होतात.

क. अवास्तव नैतिक वर्तनाच्या मापदंडामुळे अपराधीपणा व नियम झुगारून देण्याची प्रवृत्ती आढळते.

(1) फक्त अ
(2) फक्त ब
(3) फक्त अ आणि ब
(4) फक्त क

---

100. आठ आठवडे संपल्यापासुन जन्मापर्यंतच्या अवस्थेस काय म्हणतात ?

(1) बिजावस्था (2) भृणावस्था
(3) प्रसूतिवस्था (4) गर्भावस्था

---

# सूचना – (पृष्ठ 1 वरून पुढे.....)

(8) प्रश्नपुस्तिकेमध्ये विहित केलेल्या विशिष्ट जागीच कच्चे काम (रफ वर्क) करावे. प्रश्नपुस्तिकेव्यतिरिक्त उत्तरपत्रिकेवर वा इतर कागदावर कच्चे काम केल्यास ते कॉपी करण्याच्या उद्देशाने केले आहे, असे मानले जाईल व त्यानुसार उमेदवारावर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचे अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.

(9) सदर प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपल्यानंतर उमेदवाराला ही प्रश्नपुस्तिका स्वत:बरोबर परीक्षाकक्षाबाहेर घेऊन जाण्यास परवानगी आहे. **मात्र परीक्षाकक्षाबाहेर जाण्यापूर्वी उमेदवाराने आपल्या उत्तरपत्रिकेचा भाग-1 समवेक्षकाकडे न विसरता परत करणे आवश्यक आहे.**

---

## नमुना प्रश्न

प्र. क्र. **201.** "अंगावर काटा उभा राहणे" या वाक्यप्रचाराचा अर्थ काय ?

(1) अंग शहारणे (2) रोमांचित होणे

(3) अतिशय भिती वाटणे (4) बहरून येणे

ह्या प्रश्नाचे योग्य उत्तर "(3) अतिशय भिती वाटणे" असे आहे. त्यामुळे या प्रश्नाचे उत्तर "(3)" होईल, यास्तव खालीलप्रमाणे प्रश्न क्र. **201** समोरील उत्तर-क्रमांक "③" हे वर्तुळ पूर्णपणे छायांकित करून दाखविणे आवश्यक आहे.

प्र. क्र. **201.** ① ② ● ④

अशा पद्धतीने प्रस्तुत प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाचा तुमचा उत्तरक्रमांक हा तुम्हाला स्वतंत्ररीत्या पुरविलेल्या उत्तरपत्रिकेवरील त्या त्या प्रश्नक्रमांकासमोरील संबंधित वर्तुळ पूर्णपणे छायांकित करून दाखवावा. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

---

**कच्च्या कामासाठी जागा/SPACE FOR ROUGH WORK**